**बोदवड नगरपंचायत, जि.जळगाव या कार्यालयातील "मुख्याधिकारी" या पदावरील प्रतिनियुक्तीच्या कालावधीस मुदतवाढ देणेबाबत**
**श्री.गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र.कअनि-११२३/प्र.क्र.२३/प्रशा-२ (१४ब)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक:- १७ एप्रिल, २०२५

**संदर्भ:-** सा.प्र.वि., शासन आदेश समक्रमांक, दिनांक १३.०३.२०२३

**शासन आदेश**

श्री.गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी, वित्त विभाग यांची संदर्भाधीन आदेशान्वये नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील **बोदवड नगरपंचायत, जि.जळगाव** या कार्यालयातील **"मुख्याधिकारी"** या पदावर प्रथमत: ०२ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्री.तायडे हे सदर कार्यालयात दिनांक ११.०४.२०२३ पासून प्रतिनियुक्तीने कार्यरत असून त्यांचा उपरोक्त कार्यालयातील प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक १०.०४.२०२५ रोजी संपुष्टात आला आहे.

२. आता या आदेशान्वये, श्री.गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी, वित्त विभाग यांच्या नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील **बोदवड नगरपंचायत, जि.जळगाव** या कार्यालयातील **"मुख्याधिकारी"** या पदावरील प्रतिनियुक्तीच्या कालावधीस **०२ वर्ष म्हणजेच दिनांक १०.०४.२०२७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.** श्री.तायडे यांच्या प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने संदर्भाधीन दिनाक १३.०३.२०२३ च्या शासन आदेशातील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४१७१६२०३८३००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.04.17 16:22:14 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.गजानन ह. तायडे, मुख्याधिकारी, बोदवड नगरपंचायत, जि.जळगाव

**प्रत:-**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स/प्रधान सचिव, वित्त विभाग व नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सह/उप सचिव (आस्थापना), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सह/उप सचिव (नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) निवड नस्ती/प्रशा-२